**महापे, नवी मुंबई येथील महाराष्ट्र राज्य, सायबर कार्यालयाच्या इमारतीतील पाणी पूरवठाच्या नवीन जोडणीसाठी अनामत रक्कम पोटी रू.१,२८,९२३/- इतक्या रक्कमेच्या देयकास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-०३२५/प्र.क्र.७९/विशा-३(अ)**
मंत्रालय,मुंबई-४०००३२
दिनांक: २५ मार्च, २०२५

**<u>संदर्भ</u>:-**

पोलीस उप महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य साबयर, मुंबई यांचे पत्र क्र. विपोमनि/ सायबर/ १०५६/ २०२५, दि.०४.०३.२०२५

**<u>प्रस्तावना</u>:-**

महाराष्ट्र राज्य सायबर कार्यालयासाठी मिलेनियम बिझनेस पार्क, एम. आय. डी.सी. महापे, इमारत क्रमांक १०२ व १०३, सेक्टर-२, नवी मुंबई येथे ९५ वर्षाकरीता भाडेपट्टा तत्वावर एम.आय.डी.सी. नवी मुंबई यांचेकडून इमारत घेण्यात आलेली आहे. सदर इमारतीत पाणी पूरवठाच्या नवीन जोडणीसाठी अनामत रक्कमाच्या देयकापोटी रु. १,२८,९२३/- इतका निधी महाराष्ट्र सायबर कार्यालयास उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

महापे, नवी मुंबई येथील महाराष्ट्र राज्य सायबर कार्यालयाच्या इमारतीतील पाणी पूरवठाच्या नवीन जोडणीसाठी अनामत रक्कमाच्या देयकापोटी **रु.१,२८,९२३/- (अक्षरी रुपये एक लाख अठ्ठावीस हजार नऊशे तेवीस फक्त)** इतका निधी एम.आय.डी.सी. नवी मुंबई यांना अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च मागणी क्र.बी-०१, २०५५ -पोलीस (००) (१०१) गुन्हे अन्वेषण व दक्षता (००)(०६) सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष (अनिवार्य) (२०५५A ०२३) या लेखाशीर्ष मधील उद्दिष्ट १३-कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. उपरोक्त निधी खर्च करतांना वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/ प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४ नमूद करण्यात आलेल्या परिच्छेद ५ ते १९ मधील मार्गर्शक सूचना व परिशिष्टामधील मार्गदर्शक सूचनाचे काटेकोर पालन करावे व वेळोवेळी विहीत विवरणपत्रात उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे.

४. सदर निधीचे वितरणाचे आदेश वित्त विभागाच्या दि.१७.०४.२०१५ रोजीच्या शासन निर्णयामधील परिच्छेद क्र.८ नुसार दिलेल्या मान्यतेस अनुसरून व वित्त विभाग/ व्यय-७ च्या अनौपचारीक संदर्भ क्र.१७४/२०२५ दि.१२.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर निधी आहरित करण्यासाठी अपर पोलीस महासंचालक (सायबर व म.अ.प्र.), महाराष्ट्र राज्य, मुंबई हे “नियंत्रण अधिकारी” तसेच त्यांच्या अधिनस्त कार्यालयाचे वरिष्ठ कार्यालय अधीक्षक/ प्रशासकीय अधिकारी (सायबर व म. अ. प्र.), महाराष्ट्र राज्य, मुंबई हे “आहरण व संवितरण अधिकारी” राहतील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२५१६२६५२३९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SWAPNA NILESH DESHPANDE

Digitally signed by SWAPNA NILESH DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=8f33d110713d529fd14cadb7107a7a56252382926dfbbe68e0ce49aae150e1e8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F68C2CBBE864D14D120F29960E8E60D5C00E2D614E6A0234A132D68EADBD05CC, cn=SWAPNA NILESH DESHPANDE
Date: 2025.03.25 16:27:43 +05'30'

**( स्वप्ना देशपांडे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२) अपर पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य सायबर,मुंबई.
३) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६) कक्ष अधिकारी/बीयुडी-१,गृह विभाग,मुंबई.
७) कक्ष अधिकरी/व्यय-७,वित्त विभाग,मुंबई.
८) निवड नस्ती, गृह विभाग/ विशा ३ अ